सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता वनविभागाचे संगणकीकरण (२४०६ ८६६९) या राज्य योजनेतंर्गत योजनेचा चालू बाब प्रस्ताव.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२०/प्र.क्र.१३४/फ-१०**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : १३/११/२०२०

**वाचा:-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क.६४/अर्थ-३, दिनांक १६/०४/२०२०.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क.६५/अर्थ-३, दिनांक ०४/०५/२०२०.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.४३ (८६६९)/ २०१९-२०/ २२/ २०२०-२१, दिनांक १८/०५/२०२०.

**प्रस्तावना:-**

राज्य योजना अंतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता वन विभागाचे संगणकीकरण (२४०६ ८६६९) करीता खालीलप्रमाणे ८००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित केलेला आहे.

२. मार्च २०२० पासून महाराष्ट्रात कोविड-१९ च्या संसर्गजन्य रोगाचा प्रादूर्भाव होऊन कोरोनाग्रस्त बाधित रुग्णांच्या संख्येत वाढ होत आहे. या महामारीवरील प्रतिबंधात्मक उपाययोजना म्हणून संपूर्ण देशात दिनांक २४/०३/२०२० पासून टाळेबंदी (लॉकडाऊन) जाहीर करण्यात आली असून अनेक निर्बंध घालण्यात आले आहेत. सदर निर्बंधामुळे राज्याच्या कर व करेत्तर महसूलात घट होऊन राज्याच्या अर्थव्यवस्थेवर विपरित झाला आहे. याचा परिणाम म्हणून वित्त विभागाने दिनांक ०४/०५/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मूळ अर्थसंकल्पित रकमेच्या ३३ टक्के निधी कार्यक्रमांतर्गत खर्चासाठी उपलब्ध होईल या सूत्राच्या अधीन राहून निधीचे नियोजन करण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत.

३. त्यानुसार प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.३ येथे नमूद पत्रान्वये सदर योजनेसाठी मूळ अर्थसंकल्पित तरतूदीच्या ३३ % च्या मर्यादेत रु.४००.०० लक्ष इतका निधी चालू बाब प्रस्तावांतर्गत वितरीत करण्याची विनंती केली आहे. परंतु, वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर १० % निधी रु. ८०.०० लक्ष वितरित केला होता. सदर निधी अपुरा असल्याने तसेच एप्रिल ते सप्टेंबर, २०२० या सहामाहीकरीता वन विभागाचे संगणकीकरण अंतर्गत कामासाठी तातडीने निधीची आवश्यकता असल्याने वित्त विभागाकडे

अधिकची रु. २००.०० लक्ष निधीची मागणी करण्यात आली होती. वित्त विभागाने आता रु. २१८.३० लक्ष निधी वितरित करण्यास मान्यता दिलेली आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

वन विभागाचे संगणकीकरण या योजनेअंतर्गत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विभाग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावातील नमूद कामांकरिता सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीय अंदाजात सदर योजनेकरिता रु.८००.०० लक्ष इतकी तरतूद दर्शविली आहे. त्यापैकी २७.२८५% म्हणजेच रु.२१८.३० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीय प्रणालीवर वितरणाकरिता उपलब्ध आहे. त्यानुसार **रु.२१८.३० लक्ष (२८- व्यवसायीक सेवा रु.१०.९० लक्ष, ५०- इतर खर्च रु.२०७.४० लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

३. मागील वर्षी सदर योजनेकरीता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी. तसेच वन विभागाचे संगणकीकरण करणे या योजनांकरीता वेळोवेळी निर्गमित केलेल्या धोरणात्मक शासन निर्णयांमधील अटी व शर्तीची पूर्तता केली जाईल याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथे नमूद दिनांक ०४/०५/२०२० रोजीच्या शासन निर्णयाच्या अधिन राहून खर्ची टाकण्यात यावा.

५. प्रस्तुत योजनेवर होणारा खर्च मागणी क्रमांक सी-७, प्रधान लेखा शिर्ष २४०६-वनीकरण व वन्यजीवन १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निमिती, राज्य योजनांतर्गत योजना (१७) व वन विभागाचे

संगणकीकरण (१७) (०१) वन विभागाचे संगणकीकरण, ५०- इतर खर्च (२४०६ ८६६९) या लेखा शिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०२/०४/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५/०५/२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय वित्त विभागाचा संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय व सचिव (व्यय) यांनी दिनांक १६/०९/२०२० रोजी दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११३१७२०४२४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.11.13 17:22:55 +05'30'

**( अरविंद आपटे )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

६) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.

७) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

८) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

९) कार्यासन अधिकारी, ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

१०) कार्यासन अधिकारी, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.

११) निवडनस्ती, कार्यासन फ-१०.